उच्च माध्यमिक आश्रमशाळेत नियुक्त करण्यात आलेल्या उच्च माध्यमिक शिक्षकांना मान्यता प्रदान करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक उमाशि-२०१९/प्र.क्र.८६१/विजाभज-२**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२,**
**दिनांक- १० जून, २०२०.**

<u>वाचा</u> :- १.शासन निर्णय, समाज कल्याण व विशेष सहाय्य विभाग क्र.विभशा-२००६/प्र.क्र.५९/विजाभज-२, दिनांक- २६/०६/२००८

२. शासन निर्णय, समाज कल्याण व विशेष सहाय्य विभाग क्र.विभशा-२००६/प्र.क्र.५९/मावक-६, दिनांक-३१/०८/२००९

३. शासन निर्णय, समाज कल्याण व विशेष सहाय्य विभाग क्र.विभशा -२००६/प्र.क्र.४७/विजाभज-२, दिनांक- २१/०१/२०१३

<u>प्रस्तावना</u>:-

राज्य शासनाने राज्यातील विजाभज प्रवर्गाच्या मुलासाठी चालविल्या जाणाऱ्या माध्यमिक आश्रमशाळांना जोडून १४८ उच्च माध्यमिक आश्रमशाळांना परवानगी दिली होती. सदरहु शासन निर्णयानुसार उच्च माध्यमिक आश्रमशाळेच्या कला व विज्ञान शाखेत नियुक्त करावयाच्या उच्च माध्यमिक शिक्षकांची शैक्षणिक अर्हता काय असावी हे नमूद करण्यात आलेले आहे. परंतु सदरहु शासन निर्णय उच्च माध्यमिक आश्रमशाळेच्या कला शाखेत नियुक्त करण्यात येणाऱ्या शिक्षकांमध्ये अनिवार्य विषय- मराठी व इंग्रजी तसेच वैकल्पिक विषय- इतिहास, राज्यशास्त्र, समाजशास्त्र, अर्थशास्त्र असे नमूद करून देण्यात आलेले आहेत. तथापि या वैकल्पिक विषयांखेरीज काही उच्च माध्यमिक आश्रमशाळांमध्ये भूगोल या वैकल्पिक विषयाचा समावेश नसतानाही या विषयाकरीता शिक्षक नियुक्त केलेले असल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे. सदरहू नियुक्तीस सक्षम प्राधिकारी यांनी मान्यताही दिलेली आहे. अशा कर्मचाऱ्यांच्या बाबतीत आता मान्यता रद्द करण्याची कार्यवाही केल्यास अनेक न्यायालयीन प्रकरणे उद्भवण्याची शक्यता नाकारण्यात येत नाही.

शासनमान्य उच्च माध्यमिक आश्रमशाळांमध्ये शिकविल्या जाणाऱ्या विषयांच्या गटामध्ये भूगोल हा विषय अंतर्भूत असतो. बहुतांश कला शाखेतील विद्यार्थी हे इतिहास व भूगोल ह्या विषयांची निवड करतात. त्यामुळे कला शाखेच्या वैकल्पिक विषयांमध्ये भूगोल या विषयाचा समावेश करणे आवश्यक होते. परंतु संदर्भ क्र.१ चा शासन निर्णय निर्गमित करताना भूगोल या विषयाचा समावेश करण्यात आलेला नाही. यास्तव राज्यातील विजाभज उच्च माध्यमिक आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांची निकड आणि कला शाखेत नियुक्त करण्यात येणाऱ्या शिक्षकांच्या शैक्षणिक अर्हतेसंदर्भातील संदिग्धता दुर करणे आवश्यक आहे.

या विभागाच्या संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयानुसार उच्च माध्यमिक आश्रमशाळेच्या कला शाखेत शिक्षक नियुक्त करण्यास मान्यता दिल्यानंतर या उच्च माध्यमिक आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना अन्य विषयांचे अध्यापनासाठी शिक्षक उपलब्ध नसल्याने किंवा शिक्षण विभागाप्रमाणे विशिष्ट अर्हतेचे शिक्षक उपलब्ध करुन देण्यात येत नसल्याने विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होत आहे. त्यामुळे सदरहु प्रकरणी वरील सर्व बाबी विचारात घेता या विभागाच्या उच्च माध्यमिक आश्रमशाळेतील कला शाखेसाठी वैकल्पिक विषयांमध्ये भूगोल या विषयाचा समावेश करणे आवश्यक आहे. त्यामुळे सर्व बाबी विचारात घेता या विभागाच्या उच्च माध्यमिक आश्रमशाळेतील कला शाखेसाठी वैकल्पिक विषयांमध्ये भूगोल विषयाचा समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

इतर मागास बहुजन कल्याण विभागामार्फत चालविल्या जाणाऱ्या शासनमान्य अनुदानीत उच्च माध्यमिक आश्रमशाळेच्या कला शाखेकरीता वैकल्पिक विषयांमध्ये -भूगोल॰ या विषयाचा समावेश करण्यात येत आहे.

२. संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्याप्रमाणे कला शाखेत नियुक्त करावयाच्या उमेदवारांकडे आवश्यक ती शैक्षणिक अर्हता नसतांना सुद्धा यापूर्वी ज्या ज्या उमेदवारांना संबंधित प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग यांनी मान्यता दिलेली आहे, त्या उमेदवारांचे सर्व प्रस्ताव प्रादेशिक उपायुक्त यांच्या खुलाशासह कार्योत्तर मान्यतेसाठी शासनाकडे सादर करावेत. अशा प्रकरणी शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय सदर कर्मचाऱ्यांना वेतन अदा करु नये.

३. ज्या उच्च माध्यमिक आश्रमशाळांना शासनाची रितसर मान्यता देण्यात आलेली आहे व सदर उच्च माध्यमिक आश्रमशाळांमध्ये ‘भूगोल' विषयाकरीता नियुक्त करण्यात आलेल्या उच्च माध्यमिक शिक्षकांना मान्यता देण्याबाबतचे प्रस्ताव क्षेत्रीय कार्यालयाकडे प्रलंबित आहेत. तसेच या शासन निर्णयानुसार पात्र ठरतात ते प्रस्ताव सुद्धा योग्य त्या शिफारशींसह/आरक्षण धोरणानुसार बिंदुनामावलीसह शासनाकडे मान्यतेसाठी पाठवावेत. जेणे करून त्यावर गुणवत्तेनुसार योग्य तो निर्णय घेण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आलेला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२००६१११११०००४७७२२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2020.06.15 16:10:53 +05'30'

**(भा.र.गावित)**

**सह सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा.मंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री (इतर मागास बहुजन कल्याण) यांचे खाजगी सचिव.
३. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
४. प्रादेशिक उपआयुक्त, समाज कल्याण(सर्व).

५. सहायक आयुक्त, समाज कल्याण (सर्व).
६. शिक्षण अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
७. प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग मंत्रालय, मुंबई यांच्या स्वीय सहाय्यक.
८. सर्व सहसचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
९. निवड नस्ती, विजाभज-२